**महसुल व वन विभागांतर्गत मदत व पुनर्वसन प्रभागासाठी डीबीटी प्रणाली करीता महाआयटी कडील वरीष्ठ सॉफ्टवेअर डेव्हलपर, कनिष्ठ सॉफ्टवेअर डेव्हलपर व टेस्टर यांना ऑक्टोबर २०२५ पर्यंत मुदतवाढ देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसुल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: एसीवाय-२०२३/प्र.क्र.११/म-७**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक : १२ मार्च, २०२५.

**संदर्भ :-**

१) महसुल व वन विभाग शासन निर्णय क्र. एससीवाय २०१७/प्र.क्र.२२२/म-७, दि.१६.०४.२०१८
२) महाआयटीचे पत्र दि.३०.०६.२०२३
३) महसुल व वन विभाग कार्यादेश दि.२७.०९.२०२३
४) मदत व पुनर्वसन प्रभागाची दि.१४.०१.२०२५ ची विभागीय प्रकल्प अंमलबजावणीची बैठक

**प्रस्तावनाः**

महसुल व वन विभागाच्या मदत व पुनर्वसन प्रभागामार्फत दि.१६.०४.२०१८ च्या शासन निर्णयान्वये राज्याचे प्रशासन अधिक गतिमान तसेच लोकाभिमुख करण्याच्या दृष्टीने माहिती व तंत्रज्ञानाचा सुयोग्य वापर प्रशासनात व्हावा याउद्देशाने ई-प्रशासन प्रकल्प राबविण्यासाठी स्वतंत्र विभागीय प्रकल्प अंमलबजावणी समिती गठीत करण्यात आली आहे. सदर प्रकल्पांतर्गत राज्यात विविध नैसर्गिक आपत्तीमध्ये शेतीपिकांचे नुकसान झालेल्या शेतकऱ्यांना मदत देण्यासाठी शासन निर्णय महसुल व वन विभाग दि.२४ जानेवारी २०२३ अन्वये थेट हस्तांतरण प्रणाली (DBT) कार्यान्वित करण्यात आली आहे. यानुषंगाने विभागीय प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या दि.१५.०२.२०२३ रोजीच्या बैठकीतील निर्णयानूसार तांत्रिक सल्लागार मनुष्यबळ उपलब्ध करुन देण्यासाठी दि.२७.०९.२०२३ च्या शासन कार्यादेशान्वये महाआयटीस नियुक्त करण्यात आले. महाआयटीकडून डेटा बेस ॲडमिन, वरीष्ठ सॉफ्टवेअर डेव्हलपर, कनिष्ठ सॉफ्टवेअर डेव्हलपर-२ व टेस्टर अशा ५ पदांसाठी मनुष्यबळांची एका वर्षासाठी रु.५८,८७,३९५/- एवढया मानधनासह नियुक्त करण्यात आले. तथापि यापैकी वरिष्ठ सॉफ्टवेअर डेव्हलपर, कनिष्ठ सॉफ्टवेअर डेव्हलपर व टेस्टर असे तीन मनुष्यबळ रुजू झाले. सदर मनुष्यबळाचा एक वर्षाचा कार्यकाल ऑगस्ट २०२४ मध्ये संपला असल्याने महाआयटीने त्यांच्याकडील शिल्लक असलेल्या निधीच्या अनुषंगाने डिसेंबर २०२४ पर्यंत मुदतवाढ मागितली असल्याने तसेच सदर प्रकल्पावर तांत्रिक सल्लागार मनुष्यबळाची आवश्यकता असल्याने पुढील मुदतवाढ देण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय**

विभागीय अंमलबजावणी समितीच्या दि.१४.०१.२०२५ रोजी झालेल्या बैठकीतील निर्णयानूसार डीबीटी प्रणाली सुरु राहण्यासाठी महाआयटीकडील वरिष्ठ सॉफ्टवेअर डेव्हलपर, कनिष्ठ सॉफ्टवेअर डेव्हलपर व टेस्टर या पदांवरील ३ मनुष्यबळांना ऑक्टोबर २०२५ पर्यंत मुदतवाढ तसेच शासनाच्या प्रचलित दराप्रमाणे मानधन देण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. त्यानूसार सदर पदावरील

मनुष्यबळांना दि.३१ ऑक्टोबर २०२५ पर्यंत प्रचलित दराप्रमाणे मानधन अदा करण्यास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

२. वरीलप्रमाणे नियुक्त करण्यात आलेल्या मनुष्यबळांवर सोपविण्यात आलेल्या जबाबदाऱ्या वेळच्यावेळी पार पाडाव्यात व केलेल्या कामाचा अहवाल वेळोवेळी शासनास सादर करावा. तसेच शासन संसाधनाचे कार्यप्रदर्शन योग्य नसल्याचे आढळून आल्यास त्यांच्या सेवा महाआयटी या कंपनीस परत करण्यात येतील व नवीन मनुष्यबळ उपलब्ध करुन देण्याबाबत कळविण्यात येईल.

३. या प्रयोजनासाठी होणारा खर्च संबंधित लेखाशीर्षाखाली असलेल्या तरतुदीमधून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२५०३१२१५३३१०५४१९ असा आहे

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

CHULARAM RAMCHANDRA NIKHARE

Digitally signed by CHULARAM RAMCHANDRA NIKHARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FORESTS DEPARTMENT, 2.5.4.20=888a9197d5a4831c7e5ef0c4328259521ba94feaafdffb adf353be3592552a31, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E37123E923CF43F99F06B54384FF491E5F703F1 4D653B5A59D47EAB1F73E2597, cn=CHULARAM RAMCHANDRA NIKHARE
Date: 2025.03.12 15:34:12 +05'30'

**( चु. रा. निखारे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
२. मा. उपमुख्यमंत्री (नगर विकास) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/विधानसभा, महाराष्ट्र विधानभवन, मुंबई
५. मा. मंत्री (मदत व पुनर्वसन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मा. राज्यमंत्री (मदत व पुनर्वसन) यांचे खासगी सचिव, मंत्रालय, मुंबई
७. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
८. अपर मुख्य सचिव (वित्त), मंत्रालय, मुंबई,
९. अपर मुख्य सचिव (नियोजन) मंत्रालय, मुंबई.
१०. प्रधान सचिव (माहिती व तंत्रज्ञान) सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
११. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र माहिती व तंत्रज्ञान महामंडळ, मुंबई
१२. संचालक, आपत्ती व्यवस्थापन प्रभाग, मंत्रालय, मुंबई
१३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) १/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
१४. महालेखापाल (लेखा परिक्षा) १/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
१५. संबंधित अधिकारी (ल-१/म-११/म-३/ब-१/आव्यप्र-१/आव्यप्र-६), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
१६. वित्त विभाग (कार्यासन व्यय-९/अर्थ-६), मंत्रालय, मुंबई
१७. निवड नस्ती (कार्यासन / म-७)

*****